परभणी शहर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने संमत केलेला ठराव क्र. ३० दि.२/१२/२०१६ अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: पशमपा-२०१६/प्र.क्र.२९१/१६/नवि-२४,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १५ जुलै, २०१७.

**संदर्भ :-**

१) आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका यांचे क्रं.कावि/प्रशासन/३८१४/२०१६ दिनांक २१.१२.२०१६चे पत्र

२) शासन निर्णय क्रमांक: पशमपा-२०१६/प्र.क्र.२९१/१६/नवि-२४,दि.०५/०५/२०१७

**प्रस्तावना : -**

परभणी शहर महानगरपालिकेच्या मालकीचे गाळे व ओटे भाडे तत्वावर व BOT तत्त्वावर देण्यात आलेले आहेत. यापैकी कोणतेही गाळे व ओटयांचे भाडे हे तत्कालीन नगरपारिषदेने नियमाप्रमाणे ठरविलेले नाही. सदर गाळे व ओटेधारकांच्या कराराची मुदत सन १९९९ ते २०१४ या कालावधीत वेगवेगळया वर्षात संपलेली आहे. तथापि सदर करारनाम्याचे नुतनीकरण करण्यात आलेले नाही.

२. या सर्व गाळयांच्या/ओटयांच्या भाडयाचे व अनामत रक्कमाचे पुर्ण मुल्यांकन करुन त्यांचे विहीत पध्दतीने, महानगरपालिकेचे नुकसान न होऊ देता, फेरवाटप करणे आवश्यक असल्याने सहाय्यक संचालक, नगररचना विभाग यांनी प्रमाणित केल्याप्रमाणे व नगररचना विभागाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे तसेच विहीत पध्दतीने रेडी रेकनरच्या आधारे गाळयांच्या भाडयाचे व अनामत रक्कमेचे मुल्यांकन परभणी महानगरपालिका यांनी केले आहे.

तथापि सदर वाढीव भाडया विरोधात परभणी शहर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने दिनांक २/१२/२०१६ रोजी ठराव क्र. ३० पारित केला असून पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

१. सर्व गाळयांना व ओटयांना रेडी रेकनरच्या ३५% एवढेच भाडे व अनामत रक्कम आकारण्यात यावे.

२. अनामत रक्कम व भाडे यांच्यावर प्रतिवर्ष १० % वाढ करण्यात यावी.

३. व्यापाऱ्यांना एक संधी देऊन त्यांच्यावरील चालु असलेली कलम ८१-बी महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ अंतर्गत कारवाई थांबवावी.

४. याप्रमाणे कारवाई करता येत नसेल तर या संदर्भात शासनाचे मार्गदर्शन प्राप्त होईपर्यंत कारवाई थांबवावी.

३. सदरचा ठराव कोणत्याही नियमानुसार नसून त्यास कोणत्याही तरतुदीचा आधार नसल्याचे आयुक्त, परभणी महानगरपालिका यांना त्यांच्या दि. २१.१२.२०१६ च्या पत्रान्वये कळविले असून सदर ठराव विखंडीत करण्याची शिफारस शासनास केली आहे.त्यानुसार सदरचा ठराव क्र. ३० दि. २/१२/२०१६ महाराष्ट्र

महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (१) अन्वये संदर्भाधिन शासन निर्णय दि.०५/०५/२०१७ नुसार निलंबित करण्यात आलेला असून, याबाबत संबंधिताचे अभिवेदन मागविलेले होते. त्यानुसार उपायुक्त परभणी शहर महानगरपालिका यांनी परभणी शहर मनपा गाळेधारक व्यापारी संघटना यांनी यासंदर्भांत दिलेले दि.०२/०६/२०१७ चे अभिवेदन पुढील कार्यवाहीसाठी शासनाकडे पाठविलेले आहे.

४. परभणी महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेतील ठराव क्रं.३० व त्याबाबत आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका यांचे अभिप्राय विचारात घेता शासनाचे अभिप्राय पुढीलप्रमाणे आहेत:-

अ) परभणी शहरात महानगरपालिकेचे गाळे व ओटे भाडेतत्वावर व BOT तत्वावर देण्यात आलेले आहेत. यापैकी कोणत्याही गाळे व ओट्याचे भाडे हे तत्कालीन नगरपरिषदेने शासकीय नियमाप्रमाणे ठरविलेले नाही. भाडेतत्वावर दिलेल्या गाळे व ओटेधारकांच्या कराराची मुदत सन १९९९ते २०१४ या कालावधीत वेगवेगळ्या वर्षात संपलेली आहे.सदर गाळे व ओटे धारकासोबत तत्कालीन नगरपरिषदेने केलेल्या करारनाम्याप्रमाणे पोटभाडेकरू ठेवण्यास परवानगी नाही तथापी काही भाडेकरुनी पोटभाडेकरु ठेवून करारनाम्यातील अटी व शर्तीचा भंग केलेला आहे. या सर्व गाळ्याच्या भाडयांचे व अनामत रकमांचे पुनर्मुल्यांकन करुन त्याचे विहीत पध्दतीने, महानगरपालिकेचे नुकसान न होऊ देता फेरवाटप करणे आवश्यक आहे.

ब) गाळ्यांच्या भाड्याचे व अनामत रकमांचे पूनर्मुल्यांकन हे सहायक संचालक नगररचना विभाग यांनी प्रमाणीत केलेले आहे.त्यामुळे या विहीत पध्दतीने रेडीरेकनरच्या आधारे मुल्यांकन करणे योग्य आहे.गाळ्यांचे व ओट्यांचे भाडे सन २००२ पासून वाढविलेले नाही. त्यामुळे आजच्या मुल्यांकनाप्रमाणे येणारे भाडे हे १५ ते २० पटीने जास्त असले तरीही बाजारभावापेक्षा जास्त नाहीत. तसेच सदर मुल्यांकनाप्रमाणे येणारी अनामत रकमही २९ वर्षाच्या करारासाठी असल्यामुळे ती अतिशय माफक आहे.

५. परभणी शहर महानगरपालिका गाळेधारक व्यापारी संघटना यांचे दि.०५/०६/२०१७ चे अभिवेदन व त्या अनुषंगाने वरील परिच्छेद ४ मध्ये नमुद अभिप्राय विचारात घेऊन परभणी शहर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने दि.०२/१२/२०१६ रोजी पारित केलेला ठराव क्रं.३० हा अंतिम: विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

परभणी शहर महानगरपालिका सर्वसाधारण सभेने महानगरपालिकेच्या मालकीचे गाळे व ओट्यांचे भाडे व अनामत रक्कम विषयी पारित केलेला ठराव क्रं.३० दि.०२/१२/२०१६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ मधील कोणत्याही तरतुदीत बसत नसल्यामुळे व महानगरपालिकेस अहितकारक असल्याने सर्वसाधारण सभेचा ठराव क्रं.३० दि.०२/१२/२०१६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०७१५१२०३३५६८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar
Dnyandeo
Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2017.07.15 12:01:04 +05'30'

**( सुधाकर ज्ञा. बोबडे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका परभणी.

२) नगर सचिव तथा प्राधिकृत अधिकारी, परभणी शहर महानगरपालिका, परभणी

३) प्रधान सचिव, (नवि-२), नगर विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक

४) कक्ष अधिकारी, नगरविकास विभाग, नवि-१६

५) कक्ष अधिकारी, नगरविकास विभाग, नवि-२९, मंत्रालय, मुंबई (वेबसाईटवर प्रसिध्दी करिता).

६) निवड नस्ती (नवि-२४) (२ प्रती).